राष्ट्रीय अल्पसंख्याक विकास व वित्त महामंडळ , नवी दिल्ली.
सन २०१७-१८ साठी भागभांडवल अंशदान वितरीत करणेबाबत. .

# महाराष्ट्र शासन
## अल्पसंख्याक विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांक : मौआम-२०१७/प्र.क्र.५३/का.८

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २० मे, २०१७

**वाचा -**

१) वित्त विभाग : शासन परिपत्रक क्रमांक, अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि. १८ एप्रिल, २०१७.

२) अल्पसंख्याक विकास विभाग : शासन परिपत्रक क्रमांक - अविवि-२०१७/प्र.क्र. ३१/ का.७, दि.१९/४/२०१७.

**प्रस्तावना -**

राष्ट्रीय अल्पसंख्याक विकास व वित्त महामंडळ, नवी दिल्ली या महामंडळास देशातील अल्पसंख्यांकांच्या विकासाकरिता राबवावयाच्या कार्यक्रमांतर्गत महाराष्ट्र शासनाचा हिस्सा म्हणून राज्यातील अल्पसंख्यांक लोकसंख्येच्या आधारावर निश्चित करण्यात आलेले रु.७१.५७ कोटी एवढे भाग भांडवली अंशदान राज्य शासनाने दयावयाचे आहे. त्यास अनुसरुन राष्ट्रीय अल्पसंख्याक विकास एवंम वित्त निगम, नवी दिल्ली या महामंडळास सन २००२-०३ ते सन २०१६-१७ या आर्थिक वर्षामध्ये भाग भांडवलातील अंशदान म्हणून एकूण रु.२४.४२ कोटी इतके भागभांडवल वितरीत करण्यात आले आहे. आता संदर्भांकीत क्र.१ येथील वित्त विभागाच्या दि.१८ एप्रिल, २०१७ रोजीच्या परिपत्रकान्वये सन २०१७-१८ या आर्थिक वर्षाकरिता प्रथम नऊमाहीकरीता (डिसेंबर, २०१७ अखेर) योजनांतर्गत अर्थसंकल्पीत निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या भांडवली निधी वितरणाची मर्यादा १०० % इतकी राहील, अशा सूचना निर्गमित केल्या आहेत. त्यास अनुसरुन राष्ट्रीय अल्पसंख्याक विकास व वित्त महामंडळ, नवी दिल्ली यांना सन २०१७-१८ या आर्थिक वर्षाकरिता भागभांडवल उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

१. राष्ट्रीय अल्पसंख्याक विकास व वित्त महामंडळ, नवी दिल्ली या महामंडळास सन २०१७-१८ या आर्थिक वर्षाकरिता योजनांतर्गत अर्थसंकल्पित तरतूद रु.५०.०० लाख इतकी आहे. वित्त विभागाने

संदर्भ क्र.१ येथील परिपत्रकान्वये भांडवली निधी वितरणाची मर्यादा १०० % इतकी निश्चित केली असल्याने रु.५०.०० लाख (रुपये पन्नास लाख फक्त) इतका निधी भाग-भांडवली अंशदान म्हणून राष्ट्रीय अल्पसंख्यांक विकास व वित्त महामंडळ, नवी दिल्ली या महामंडळास वितरीत करण्यास याव्दारे मंजूरी देण्यात येत आहे. हे भाग-भांडवल वितरीत केल्यानंतर राष्ट्रीय अल्पसंख्याक विकास व वित्त महामंडळाकडे महाराष्ट्र शासनाचे एकूण वितरीत भागभांडवल रुपये २४.९२ कोटी इतके होईल.

२. उपरोक्त भागभांडवल राष्ट्रीय अल्पसंख्यांक विकास व वित्त महामंडळ, नवी दिल्ली यांना प्रदान करण्यासाठी अवर सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना "आहरण व संवितरण अधिकारी" आणि उपसचिव, अल्पसंख्यांक विकास विभाग यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना याबाबतच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर महामंडळास उक्त रक्कम एक रकमी पध्दतीने त्वरीत अदा करण्यात यावी.

३. सदर रक्कमेचा ई.सी.एस. (E.C.S.) अवर सचिव (१), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे नावे काढण्यात यावा.

४. वरील भागभांडवली अंशदानाच्या अनुषंगाने होणारा खर्च पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व तो सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात मंजूर केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक झेडई-२,
४२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण यावरील भांडवली खर्च,
०२, समाजकल्याण,
१९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांतील गुंतवणूक (योजनांतर्गत),
राज्य योजनांतर्गत योजना,
(१) महामंडळांना सहाय्य
(०१)(०३) राष्ट्रीय अल्पसंख्याक विकास व वित्त महामंडळाला भाग भांडवली अंशदान,
(४२३५ ०२४२)
३२ अंशदान

५. "वित्त विभागाच्या संदर्भ क्र. १ च्या दि.१८ एप्रिल, २०१७ च्या शासन परिपत्रकामधील परिच्छेद क्र. ७ ते १८ मधील अटींची पुर्तता तसेच सदर परिपत्रकासोबत जोडलेल्या प्रत्येक परिशिष्टातील अटींची पुर्तता करण्यात आली आहे."

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५१५१०४०४०२११४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shamlal R Chaure

Digitally signed by Shamlal R Chaure
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minority, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f297dc66bbf139a70b9a7f405528e318890087680cc7a9c0ce19f213232572bd, cn=Shamlal R Chaure
Date: 2017.05.20 15:59:55 +05'30'

**( श्या. र. चौरे )**

उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखा व अनुज्ञेयता),मुंबई/नागपूर
२) महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखा व परीक्षा ), मुंबई/नागपूर
३) व्यवस्थापकीय संचालक, राष्ट्रीय अल्पसंख्याक विकास एवंम वित्त महामंडळ, नवी दिल्ली
४) उपसचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५) अवर सचिव (रोख शाखा), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी कृपया सदर रक्कमेचा धनादेश "Managing Director, National Minorities Development & Finance Corporation, New Delhi" या नावाने संबंधिताना देण्यात यावा.
६) व्यवस्थापकीय संचालक, मौलाना आझाद अल्पसंख्याक आर्थिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई
७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (रोख शाखेमार्फत)
८) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
९) सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, पाचवा मजला, मुंबई
१०) वित्त विभाग (अर्थसंकल्प -१४, व्यय -४ व साउ) मंत्रालय, मुंबई
११) नियोजन विभाग (कार्या.१४७५)
१२) रोख शाखा व का.७, अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१३) निवड नस्ती, का.८.